**मा. उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथील रिपिटिशन क्र. ४३३९/२००३ मध्ये दि.१०/०८/२०१८ रोजीच्या न्यायनिर्णया नुसार १२ रोजदांरी मजूरांना माहे नोंव्हेंबर,१९९९ ते डिसेंबर,२००१ या कालावधितील १/२६ दराने रोजंदारीच्या फरकाची रक्कम अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र-२०२०/प्र.क्र.७३/१३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
तारीख: २७ सप्टेंबर,२०२१

वाचा:-

१) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. युएलपी-१०१९/२३६४६/२२०४/प्र.क्र.९९/आस्था-३/१०२७८, दि.१२/०३/२०२०.
२) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अहमदनगर यांचे पत्र क्र.आस्था/अधि/अ-४/२७२८/२०, दि.२२/०६/२०२०.
३) मा. औद्योगिक न्यायालय, अहमदनगर, रिव्हिजन ॲप्लिकेशन क्र ०६/२००० चा न्यायनिर्णय दि.१९/०३/२००३
४) मा. उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथील रिपिटिशन क्र. ४३३९/२००३ चा न्यायनिर्णय दि.१०/०८/२०१८.

प्रस्तावना:-

जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अहमदनगर कार्यालयाच्या अधिनस्त तालुका फळरोपवाटीका. कुकाणा ता. नेवासा जि.अहमदनगर येथील १२ रोजंदारी मजूर यांनी मा. उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथे रिट पिटीशन क्र. ४३३९/२००३ दाखल केले होते. त्यामध्ये दिनांक १०/०८/२०१८ रोजी न्यायनिर्णय होवून रोजंदारी मजूरांना १/२६ दराने फरक रक्कम देण्याचे आदेशित करण्यात आले आहे. त्याअनुषंगाने कृषि आयुक्तालया मार्फत शासनास १२ रोजंदारी मजूरांच्या रोजंदारीची रक्कम रु. १,५१,०१६ (अक्षरी रुपये एक लाख एकावन्न हजार सोळा फक्त) अदा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या मंजूरीसाठी सादर करण्यात आला आहे. सदर १२ रोजंदारी मजूरांच्या फरकाच्या रकमेस मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

## शासन निर्णय:-

जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अहमदनगर कार्यालयाच्या अधिनस्त तालुका फळरोपवाटीका. कुकाणा ता. नेवासा जि.अहमदनगर येथील १२ रोजंदारी मजूर यांनी मा. उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथे रिट पिटीशन क्र. ४३३९/२००३ दाखल केलेल्या प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी दिलेल्या दिनांक १०/०८/२०१८ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार खालील १२ रोजदांरी मजूरांना रु. १,५१,०१६ रुपये (अक्षरी रुपये एक लाख एकावन्न हजार सोळा फक्त) मजूरीच्या फरकाची रक्कम अदा करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | रोजंदारी मजुराचे नाव | तक्रार युएलपो क्र. व कालावधी | न्यायनिर्णय नुसार १/२६ दरा प्रमाणे देय रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | श्री. बबन भागचंद काळे | ६३६/२००३ (माहे. नोव्हेंबर,१९९९ ते डिसेंबर,२००१ या कालावधीतील फरकाची रक्कम) | १४,०१० |
| २ | श्रीमती. मालनबाई बबन काळे | | १५,७२१ |
| ३ | श्रीमती. मुक्ताबाई प्रकाश कांबळे | | १५,७१६ |
| ४ | श्रीमती. सुमनबाई विजय कांबळे | | १२,६१७ |
| ५ | श्रीमती. शिलाबाई गुलाब गायकवाड | | १५,९३६ |
| ६ | श्रीमती. पद्माबाई पावलस रणदिवे | | १९,०९१ |
| ७ | श्रीमती, लिलाबाई गोडीबा कानडे | | ११,०५२ |
| ८ | श्रीमती. अलेशा रावसाहेब गायकवाड | | १२,४८० |
| ९ | श्रीमती. कौसाबाई दशरथ कांबळे | | १३,८५८ |
| १० | श्रीमती, साखराबाई देवराव इंगळे | | १५,०२५ |
| ११ | श्री. रावणराव नाना जगधने | | ५,५१० |
| १२ | श्रीमती. वाल्हाबाई रामचंद्र पवार | | ० |
| | एकुण | | १,५१,०१६ |

वरील प्रमाणे देय रक्कम रु.१,५१,०१६/- (अक्षरी रुपये एक लाख एकावन्न हजार सोळा फक्त) खालील लेखाशिर्षाखाली खर्च करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. या वरील होणारा खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात खालील लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीतून करण्यात यावा. तसेच सदर रक्कम कोषागारातून आहरीत व वितरीत करण्यासाठी जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अहमदनगर यांना आहरण व संविरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अहमदनगर कार्यालयाच्या अधिनस्त तालुका फळरोपवाटीका, कुकाणा ता.नेवासा, जि.अहमदनगर येथील १२ रोजंदारी मजूरांना माहे नोव्हेंबर,१९९९ ते माहे डिसेंबर,२००१ या कालावधीतील रोजंदारीच्या फरकाची रक्कम अदा करण्यासाठी सदर खर्च मागणी क्र. डी-३, २४०२-पिक संवर्धन, ११९ बागायती व भाजीपाला पिके, ११९ (०३)रोपमळे (०३)(०१), भाजीपाला रोपमळे फळ रोपमळे व स्थानीक उद्याने (२४०१ १७२२) (०२ मजुरी) या अंतर्गत करण्यात यावा.

४. न्यायालयीन प्रकरणात वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला, उप विभाग-दोन, अनु.क्र.२, नियम ७ नुसार प्रशासकीय विभाग प्रमुख यांना पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. आयुक्त (कृषि) कार्यालयाने मा.न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयानुसार देय ठरविणारी रक्कम शासनाचे प्रचलित नियम, अटी व शर्ती आणि आदेशाचे अनुपालन करुन वितरीत करण्यात यावा. तसेच या प्रकरणी कोणतेही प्रशासकीय वा वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदरचा शासन निर्णय विधी व न्याय विभागाचा अनौपचारिक संदर्भ युओआर क्र.१५८/२०२१, दि.१६/९/२०२१ रोजीच्या अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२७१२४१३७६७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रांचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Hemant Gorakhnath Mhapankar
Date: 2021.09.27 12:43:51 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत अग्रेषित:-**

१) प्रधान सचिव (व्यय) वित्त विभाग,मंत्रालय. मुंबई.
२) सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय. मुंबई.
३) उप सचिव (फलोत्पादन) कृषि पदुम विभाग, मंत्रालय. मुंबई.

**प्रत:-**

१) आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य पुणे.
२) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई/ नागपूर.
४) सह संचालक (आस्थापना),कृषि आयुक्तालय,पुणे.
५) विभागीय कृषि सह संचालक , पुणे.
६) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,अहमदनगर,
७) जिल्हा कोषगार अधिकारी, अहमदनगर,
८) वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
९) निवड नस्ती-१३-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.